पंडीत दिनदयाल उपाध्याय डेंटल कॉलेज, केगाव, सोलापूर

---------------------------------------

दंत पदव्युत्तर पदवी अभ्यासक्रमाच्या विद्यार्थी प्रवेश क्षमतेत वाढ करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**

वैद्यकीय शिक्षण व औषधीद्रव्ये विभाग,
शासन निर्णय क्रमांक.एमईडी १०२३/प्र.क्र.४४४/२३/शिक्षण-२
गो.ते.रुग्णालयाची नवीन इमारत, ९ वा मजला, गो.ते. रुग्णालय संकुल,
लोकमान्य टिळक मार्ग, नवीन मंत्रालय,मुंबई ४०० ००१.
दिनांक:- १६/०४/२०२५

**संदर्भ:-** १) आरोग्य व कुटुंब कल्याण मंत्रालय, नवी दिल्ली यांचे पत्र क्र.V.१२०१७/२५/२०२४-DE, दि.२८/०२/२०२५.
२) शासनाचे प्रमाणपत्र समक्रमांक दिनांक २८/११/२०२३.

प्रस्तावना :- पंडीत दिनदयाल उपाध्याय डेंटल कॉलेज, केगाव,सोलापूर या महाविद्यालयामध्ये एकूण ०३ विषयात दंत पदव्युत्तर पदवी अभ्यासक्रमाच्या विद्यार्थी प्रवेश क्षमतेत वाढ करण्यांस संदर्भ क्र.२ येथील पत्रान्वये "प्रमाणपत्र" देण्यात आले होते. त्यानुषंगाने आरोग्य व कुटुंब कल्याण मंत्रालय, नवी दिल्ली यांनी संदर्भ क्र.१ येथील पत्रान्वये सदर अभ्यासक्रमाच्या विद्यार्थी प्रवेश क्षमतेत वाढ करण्यास मान्यता (Letter of Permission) दिली आहे. आरोग्य व कुटुंब कल्याण मंत्रालय, नवी दिल्ली यांनी दिलेल्या मान्यतेनुसार उक्त संस्थेस सन २०२५-२६ या शैक्षणिक वर्षाकरिता दंत पदव्युत्तर पदवी अभ्यासक्रमाच्या विद्यार्थी प्रवेश क्षमतेत वाढ करण्यास मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

शासन निर्णय:- पंडीत दिनदयाल उपाध्याय डेंटल कॉलेज, केगाव,सोलापूर या संस्थेस सन २०२५-२६ या शैक्षणिक वर्षाकरिता खालील विवरणपत्रात नमूद दंत पदव्युत्तर पदवी अभ्यासक्रमाची विद्यार्थी प्रवेशक्षमता वाढ करण्यास याद्वारे शासनाची मान्यता देण्यात येत आहे :-

| अ.क्र. | अभ्यासक्रम | विद्यार्थी प्रवेशक्षमता वाढ |
|---|---|---|
| १ | MDS (Prosthodontics and Crown & Bridge) | ०२ to ०५ |
| २ | MDS (Orthodontics and Dentofacial Orthopedics) | ०२ to ०५ |
| ३ | MDS (Conservative Dentistry and Endodontics) | ०३ to ०६ |

२. उपरोक्त मान्यता ही पुढील अटी व शर्तीच्या अधीन राहिल:-

१. सदर दंत महाविद्यालयातील उक्त नमूद दंत पदव्युत्तर पदवी अभ्यासक्रमांची विद्यार्थी प्रवेशक्षमता ही आरोग्य व कुटुंब कल्याण मंत्रालय, नवी दिल्ली यांनी निर्धारित केल्यानुसार राहिल.

२. राज्य शासन/केंद्र शासन/मा. सर्वोच्च न्यायालय/मा. उच्च न्यायालय यांनी वेळोवेळी दिलेल्या आदेशानुसार सदर अभ्यासक्रमाच्या प्रवेशाकरिता निश्चित करण्यात आलेली कार्यपध्दती अवलंबिण्यात यावी.

३. शासकीय नियम/कायदा तसेच, मा. सर्वोच्च व मा. उच्च न्यायालय यांनी वेळोवेळी दिलेल्या निर्णयानुसार शैक्षणिक शुल्क आकारणीसाठी कार्यपध्दती अनुसरणे वेळोवेळी भाग असेल, त्याप्रमाणे शैक्षणिक शुल्क निश्चित करण्यात यावे.

४. केंद्र शासन, भारतीय दंत परिषद, नवी दिल्ली, महाराष्ट्र आरोग्य विज्ञान विद्यापीठ, नाशिक व राज्य शासन यांनी दंत अभ्यासक्रमाबाबत वेळोवेळी विहीत केलेल्या नियमांचे व मानकांचे पालन करणे संस्थेवर बंधनकारक राहिल.

५. महाराष्ट्र एज्युकेशनल इन्स्टिटयुशन्स (प्रोव्हिबिशन ऑफ कॅपिटेशन फी) ॲक्ट, १९८७ (महाराष्ट्र ॲक्ट १९९८ चा ६) मधील तरतूदींचे संस्थेने काटेकोरपणे पालन करणे आवश्यक आहे.

६. सदरहू संस्थेस कायम विना अनुदान तत्वावर मान्यता देण्यात आली आहे. त्यामुळे संस्था आवती/अनावर्ती स्वरुपाच्या खर्चासाठी अनुदानाची मागणी शासनाकडे करणार नाही.

७. शासकीय दंत किंवा तत्सम महाविद्यालयातील कोणत्याही अध्यापकांस तो सेवानिवृत्त होईपर्यंत संस्थेमध्ये नोकरी देता येणार नाही किंवा त्याच्या सेवा संस्थेस वापरता येणार नाहीत.

८. महाराष्ट्र आरोग्य विज्ञान विद्यापीठ, नाशिक यांचे मंजूर वाढीव जागांकरिता संलग्निकरण प्राप्त झाल्याशिवाय विद्यार्थी प्रवेशित करण्यात येऊ नयेत.

९. संस्थेने कोणत्याही परिस्थितीत शासनाने मान्य केलेल्या विद्यार्थी प्रवेशक्षमतेपेक्षा जास्त विद्यार्थी प्रवेश करण्यात येऊ नये.

१०. गुणवत्तेवर आधारित प्रवेश केलेल्या विद्यार्थ्यांचे प्रवेश हे प्रवेश नियामक प्राधिकरण, मुंबई यांच्याकडून आणि विद्यार्थ्यांचे शैक्षणिक शुल्क हे शुल्क नियामक प्राधिकरणाकडून मंजूर करुन घेणे संस्थेवर बंधनकारक राहिल.

११. सन २०२५-२६ या शैक्षणिक वर्षाकरिता परवानगी दिलेली असल्याने संस्थेने पुढील वर्षी विद्यार्थी प्रवेश करण्यापूर्वी भारतीय दंत परिषद, नवी दिल्ली/ केंद्र शासनाच्या तसेच त्या आधारे राज्य शासनाच्या परवानगीचे अनुषंगाने आवश्यक कार्यवाही करणे बंधनकारक राहिल.

१२. आरोग्य व कुटुंब कल्याण मंत्रालय, नवी दिल्ली यांच्या संदर्भाधीन क्र.१ वरील पत्रात नमूद अटींची पूर्तता करण्याच्या अधीन राहून प्रस्तुत मान्यता देण्यात येत आहे.

३. सदर शासन निर्णय आरोग्य व कुटुंब कल्याण मंत्रालय, नवी दिल्ली यांच्या संदर्भित दिनांक २८/०२/२०२५ च्या पत्रान्वये दिलेली मान्यता विचारात घेऊन व महाराष्ट्र आरोग्य विज्ञान विद्यापीठ अधिनियम, १९९८ मधील कलम ६४ (५) नुसार शासनास प्रदत्त असलेल्या अधिकारांचा वापर करुन निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२५०४१६१६०१२९३४१३ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

PAWAR TUSHAR PITAMBAR

Digitally signed by PAWAR TUSHAR PITAMBAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=MEDICAL EDUCATION AND DRUGS DEPARTMENT, 2.5.4.20=0e7c2b89250ac281fa15181edd75966aecf408d6530259d654b6605cd5fc363d, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=8B620EC181468E9AE13715CE8039879786D8786251F299A0EBE5B1878CD6E05C, cn=PAWAR TUSHAR PITAMBAR
Date: 2025.04.16 16:06:31 +05'30'

(डॉ. तुषार पवार)
उप सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. मा. राज्यपाल यांचे सचिव, राज्यपाल सचिवालय, राज भवन, मलबार हिल, मुंबई
२. मा. सभापती, महाराष्ट्र विधानपरिषद, मुंबई यांचे सचिव, विधान भवन, मुंबई
३. मा. अध्यक्ष, महाराष्ट्र विधानसभा, मुंबई यांचे सचिव, विधान भवन, मुंबई
४. मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई
५. मा. मंत्री (वैद्यकीय शिक्षण) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
६. मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन, मंत्रालय, मुंबई
७. सचिव, भारत सरकार, आरोग्य व कुटूंब कल्याण मंत्रालय, निर्माण भवन, नवी दिल्ली-११०००११
८. सचिव, भारतीय दंत परिषद, ऐवान-ए-गालिब मार्ग, कोटला रोड, नवी दिल्ली-११० ००२.
९. सचिव, वैद्यकीय शिक्षण व औषधिद्रव्ये विभाग, मंत्रालय, मुंबई यांचे स्वीय सहाय्यक
१०. महासंचालक, माहिती व जनसंपर्क संचालनालय, मंत्रालय, मुंबई
११. आयुक्त, वैद्यकीय शिक्षण, मुंबई
१२. आयुक्त, राज्य सामाईक प्रवेश परीक्षा कक्ष, मुंबई
१३. संचालक, वैद्यकीय शिक्षण व संशोधन संचालनालय, मुंबई
१४. सहसंचालक (दंत), वैद्यकीय शिक्षण व संशोधन संचालनालय, मुंबई
१५. कुलसचिव, महाराष्ट्र आरोग्य विज्ञान विद्यापीठ, नाशिक
१६. सचिव, प्रवेश नियामक प्राधिकरण, मुंबई
१७. सचिव, शुल्क नियामक प्राधिकरण, मुंबई
१८. प्राचार्य, पंडीत दिनदयाल उपाध्याय डेंटल कॉलेज, केगाव,सोलापूर-४१३ २५५
१९. निवडनस्ती (शिक्षण-२)